अल्पसंख्याक बहुल क्षेत्रामध्ये अल्पसंख्याक महिलांसाठी राबविण्यात येत असलेल्या बचत गट योजनेसाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१५ ते नोव्हेंबर, २०१५ या आठमाहीकरिता अनुदान वितरीत करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांक : मविम- २०१५/प्र.क्र. ११० /का-९
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०१/०६/२०१५.

संदर्भ- १) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१४/का.९, दि. २८ फेब्रुवारी, २०१२.
२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. बियुडी-२०१४/प्र.क्र.१०८/ का.९, दि. १२ जानेवारी, २०१५.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५.
४) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.बीयुडी-२०१४/प्र.क्र.१४८ (भाग- २)/का-७, दि.२१ एप्रिल, २०१५.

शासन निर्णय :-

राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात वास्तव्यास असलेल्या अल्पसंख्याक लोकसमूहातील महिलांच्या आर्थिक सक्षमीकरणासाठी त्यांना संघटीत करून पुरेसा पतपुरवठा उपलब्ध करून देणे व त्यांना उद्योजकतेविषयक आवश्यक असलेली माहिती देऊन त्यांच्यामध्ये उद्योजकीय कौशल्ये विकसित करण्याच्या हेतून संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयाद्वारे अल्पसंख्याक लोकसमूहातील महिलांचे स्वयंसहाय्यता गट स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या अंतर्गत पहिल्या टप्प्यात मुंबई शहर, मुंबई उपनगर, नांदेड, मालेगांव, कारंजा, परभणी, पुणे, नागपूर, औरंगाबाद, भिवंडी, मुंब्रा-कौसा आणि मिरज येथे अल्पसंख्याक लोक समुहातील महिलांचे स्वयंसहाय्यता बचत गट स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत अल्पसंख्याक महिलांचे २४०० बचत गट निर्माण करून त्यांचे १३ लोकसंचलित साधन केंद्र ८ वर्षाच्या कालावधीत उभी राहणार आहेत. या करीता रु. २७,५४,३२,६३९ /- (अक्षरी रू.सत्तावीस कोटी चोपन्न लक्ष बत्तीस हजार सहाशे एकोणचाळीस फक्त) इतक्या अपेक्षित खर्चास दि.१/३/२०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. ही योजना महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत राबविण्यात येत आहे.

२. महिला आर्थिक विकास महामंडळाला यापूर्वी संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये या प्रयोजनार्थ वाटप करण्यात आलेला रु.१,०८,००,०००/- (अक्षरी रू. एक कोटी आठ लक्ष फक्त) इतका निधी खर्च झाला आहे.

३. सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात या प्रयोजनासाठी रु. १,४०,००,०००/- (अक्षरी रू. एक कोटी चाळीस लक्ष फक्त) निधी मंजूर आहे. संदर्भ क्र. २ येथील शासन परिपत्रकाद्वारे सदर निधीच्या ७०% मर्यादेपर्यंतचा

म्हणजेच रू. ९८,००,०००/- (अक्षरी रू. अठ्ठ्यान्नव लक्ष फक्त) इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळाला वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर रकमेचा Electronic Clearing Service (ECS) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नावे काढण्यात यावा.

५. या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महिला आर्थिक विकास महामंडळाने शासनास सादर करणे आवश्यक राहील. प्रस्तुत प्रकरणी सदर रक्कम आहरीत करण्यासाठी अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग नियंत्रण अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

६. यासाठी होणारा खर्च सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र. झेडई-१, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१०) स्वयंसहाय्य गटाकरीता सहायक अनुदान (२२३५ ए १६९), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

७. महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत याबाबतचे वर्षनिहाय खर्चाचा लेखाविषयक तपशिल ठेवावा, ज्या बाबींसाठी अनुदान वितरीत करण्यात आले आहे त्याबाबींवरच खर्च करण्यात यावे. सदर बाबींचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील. अल्पसंख्याक विकास विभागाचे अधिकारी स्वयंसहायता बचत गटास भेट देतील.

८. सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०११६२३४१८७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2015.06.01 16:24:53 +05'30'

**(अशोक गायकवाड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा.मंत्री/ राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
७) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
८) संचालक, लेखा व कोषागारे
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
११) सर्व विभागीय आयुक्त,
१२) सर्व जिल्हाधिकारी,
१३) महिला आर्थिक विकास महामंडळ, गृहनिर्माण भवन, कलानगर, बांद्रा (पूर्व) मुंबई,
१४) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१५) सर्व मंत्रालयीन विभाग
१६) उप सचिव, वित्त विभाग (व्यय-४), अर्थ-१४ नियोजन विभाग (का-१४७५) मंत्रालय, मुंबई,
१७) अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग/ अर्थसंकल्प शाखा, मंत्रालय, मुंबई,
१८) निवडनस्ती (कार्यासन-९)